**सन २०१५-१६ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेस अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान करणे तसेच योजनेंतर्गत ₹ १०० कोटी निधी मंजूर प्रकल्पांना वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राकृवि ०४१५/प्र.क्र. ३१/राकृवियो कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ३१ ऑगस्ट, २०१५

**वाचा :**

१. केंद्र शासनाचे पत्र क्र. ७-१/२०१५- आरकेव्हीवाय, दि. १५/०४/२०१५
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांक राकृवि ०४१५/प्र.क्र. ३१/राकृवियो कक्ष दि. २२/०५/२०१५
३. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ५-१/२०१५-आरकेव्हीवाय, दि. २७/०५/२०१५
४. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.१११/अर्थ-३ दि. ३०/०६/२०१५
५. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१५-आरकेव्हीवाय, दि. १६/०७/२०१५.
६. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. संकीर्ण - २०१५/प्र.क्र.३४/कोषा.प्रशा-५ दि. २४/०७/२०१५

**प्रस्तावना :**

११ व्या पंचवार्षिक योजनाकाळात कृषि व कृषि संलग्न क्षेत्राचा विकास दर ४% साध्य करण्याकरीता केंद्र शासनाने सन २००७-०८ या वर्षापासून राष्ट्रीय कृषि विकास योजना सुरु केलेली असून योजनेंतर्गत प्राप्त उपलब्ध होणारा निधी जमा करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांचे नावे नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) उघडण्यात आलेले आहे.

सन २०१५-१६ पासून कृषि उन्नती योजनेच्या अंतर्गत राष्ट्रीय कृषि विकास योजना केंद्र व राज्य शासनाच्या ५०: ५० अर्थसहाय्याने राबविण्याबाबत संदर्भांकित दि.२७/०५/२०१५ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तसेच केंद्र शासनाने दि. १५/०४/२०१५ व दि.२७/०५/२०१५ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत 'सर्वसाधारण राकृवियो (Normal RKVY)' करीता ₹३११.६२ कोटी निधी व विदर्भ सघन सिंचन विकास कार्यक्रमाकरीता (VIIDP)

₹ ७५ कोटी निधी असे एकूण ₹ ३८६.६२ कोटी निधीचे चालू वर्षाकरीता केंद्र हिस्याचे राज्यास नियतवाटप (Allocation) कळविले आहे. त्यानुषंगाने, राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्य शासनाचा समरुप ५० % हिस्सा म्हणून ₹ ३८६.६२ कोटी आर्थिक सहभाग अपेक्षित आहे. अशाप्रकारे चालू वर्षी राष्ट्रीय कृषि विकास योजनेकरीता एकूण ₹ ७७३.२४ कोटी निधी उपलब्ध होणे अपेक्षित आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्यास मंजूर केलेल्या केंद्र हिस्सा ₹ ३८६.६२ कोटी रकमेपैकी पहिल्या हफ्त्यामध्ये ५०% म्हणजेच एकूण ₹ १९३.३१ कोटी निधी संदर्भांकित दि. १६/०७/२०१५ च्या पत्रान्वये राज्य शासनास वितरीत केला आहे. सदर निधीपैकी ₹ १०० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरीता उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

१. सन २०१५-१६ मध्ये कृषि उन्नती योजनेंतर्गत - राष्ट्रीय कृषि विकास योजनेची केंद्र व राज्याच्या ५०:५० आर्थिक सहभागासह अंमलबजावणी करण्यास शासनाची अंतरीम प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत केंद्र व राज्याच्या आर्थिक सहभागामध्ये केंद्र शासनाने चालू वर्षी काही फेरबदल केल्यास सदर बदलानुसार योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल तथापि, त्याबाबत स्वतंत्रपणे उचित आदेश निर्गमित करण्यात येतील.

२. सन २०१५-१६ करीता केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत केंद्र हिस्सा म्हणून राज्यास एकूण ₹ ३८६.६२ कोटी रकमेचे नियत वाटप मंजूर केले असून, त्यानुषंगाने योजनेंतर्गत समरुप राज्य हिस्सा ₹ ३८६.६२ कोटी गृहीत धरुन ₹ ७७३.२४ कोटी रकमेचा कार्यक्रम चालू वर्षी राबविण्यास अंतरीम मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सन २०१५-१६ करीता राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत पुढील मंजूर प्रकल्पांकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचे मिळून एकूण ₹ १०० कोटी निधी (रुपये शंभर कोटी फक्त) पुढीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहेत -

| अ.क्र. | योजनेचे नाव | विभाग | मंजूर निधी (₹ कोटी) | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
| १. | विदर्भ सघन सिंचन विकास कार्यक्रम (VIIDP) | जलसंधारण | ५२.५० | २२.५० | ७५.०० |
| २. | गतिमान वैरण विकास कार्यक्रम (AFDP) | कृषि | १७.५० | ७.५० | २५.०० |
| | | **एकूण** | **७०.००** | **३०.००** | **१००.००** |

४.	राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध झालेला ₹ १०० कोटी (रुपये शंभर कोटी फक्त) निधी खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०१५-१६ करिता अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

**मागणी क्रमांक डी -३**
**२४०१- पीक संवर्धन**
(००) (८००) इतर खर्च
(००) (०९) राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य
(२४०१ ८२३५) योजनांतर्गत/दत्तमत
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना)
३३-अर्थसहाय्य

५.	सन २०१५-१६ मध्ये दुष्काळी परिस्थीतीच्या पार्श्वभूमीवर 'महात्मा फुले जल-भूमी संधारण अभियानाकरीता' राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत राज्य हिस्स्यातून ₹ ४० कोटी निधी संदर्भांकित शासन निर्णय दि. २२/०५/२०१५ अन्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे, आता या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांसाठी ₹ १०० कोटी निधी वितरीत करण्यात येत आहेत. अशाप्रकारे, आजमितीस योजनेंतर्गत एकूण ₹ १४० कोटी निधीचे वितरण साध्य होत असून, निधी वितरणामध्ये केंद्र व राज्याचा प्रत्येकी ५०% आर्थिक सहभाग सुनिश्चित होण्याच्या दृष्टीने या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या ₹ १०० कोटी निधीपैकी ₹ ३० कोटी निधी राज्य हिस्सा म्हणून वितरीत करण्यात येत आहेत आणि उर्वरीत ₹ ७० कोटी निधी केंद्र हिस्सा म्हणून वितरीत करण्यात येत आहे.

६.	उपरोक्त मंजूर ₹ १००.०० कोटी रक्कमेच्या कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७.	सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली ₹ १०० कोटी इतकी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावी व तसे शासनास अवगत करावे.

८.	आयुक्त (कृषि) यांनी सदर ₹ १०० कोटी निधी राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीकरिता संबंधित विभाग/यंत्रणांच्या मागणी नुसार चालू वर्षाकरीता प्रकल्पाकरीता मंजूर केलेल्या वित्तीय मर्यादेमध्ये संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.

९. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधीचे तात्काळ उपयोजन होण्याच्या हेतूनेच कोषागरातून आहरीत करावा आणि सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना प्राप्त होणा-या निधीचा तात्काळ विनियोग करावा. तसेच अंमलबजावणी यंत्रणांनी सदर निधी उपयोजनाविना बँक खात्यामध्ये जमा करुन ठेवू नये.

१०. केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००७-०८ पासून सन २०१३-१४ पर्यंत विविध विभागांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन तसे प्रमाणित केल्यासच सदर योजनेंतर्गत उर्वरीत निधी दुसऱ्या टप्प्यामध्ये वितरीत करण्यात येईल, असे निर्देशीत केलेले आहे. यास्तव सन २००७-०८ ते सन २०१३-१४ या कालावधीत सर्व अंमलबजावणी यंत्रणांना/विभागांना वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरीक्षण होऊन लेखा आक्षेपांची पूर्तता केली असली तरच संबंधित यंत्रणांना दुसऱ्या टप्प्यातील निधी वितरीत करण्यात येईल. सबब, सर्व अंमलबजावणी यंत्रणांनी/विभागांनी त्यांना सन २००७-०८ ते सन २०१३-१४ या कालावधीत वितरीत करण्यात आलेल्या निधीचे लेखापरिक्षण झाल्याचे प्रमाणित करावे.

११. संबंधित विभागांनी / अंमलबजावणी यंत्रणांनी त्यांना वितरीत केलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करावा तसेच प्रकल्पांतर्गत भौतिक व आर्थिक लक्ष्यांक पुर्ततेचा प्रगती अहवाल RDMIS प्रणालीवर वेळोवेळी सादर करावा.

१२. केंद्र सहाय्यीत योजनकरीता निधी वितरणासाठी वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५ नुसार विहीत करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे सबब, सदर शासन परीपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०४१३३२४०९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.09.04 14:42:47 +05'30'

**(सु,सं.धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई

२. अपर मुख्य सचिव (कृषि व पणन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव (जलसंधारण), मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
९. मुख्य अभियंता (VIIDP), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर
१०.संचालक (मृद संधारण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
११.महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१२.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१५.सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१६.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
१७.निवड नस्ती.